राज्य पोलीस दल, मुंबई पोलीस दल व न्यायसहाय्यक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, इत्यादीसाठी खरेदी करण्यात येणा-या साहित्यासाठी निविदा प्रक्रिया राबविण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन शुध्दीपत्रक, क्रमांक एमआयएस ०४०९/५९२/प्र.क्र.२७०/पोल-४,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ९ सप्टेंबर, २००९.

**वाचा:-** १) शासन निर्णय, गृह विभाग, क्र.एमआयएस ०४०९/५९२/प्र.क्र.२७०/पोल-४, दिनांक २० मे, २००९.
२) शासन निर्णय, गृह विभाग, क्र.एमआयएस ०४०९/५९२/प्र.क्र.२७०/पोल-४, दिनांक ३ जून, २००९
३) शासन शुध्दीपत्रक, गृह विभाग, क्र.एमआयएस ०४०९/५९२/प्र.क्र.२७०/पोल-४, दिनांक ८ जून, २००९.

**प्रस्तावना:-** पोलीस विभागासाठीची खरेदी ही वेळेत व पारदर्शक पध्दतीने होण्याच्या दृष्टीने संदर्भाधीन अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये खरेदी समितीचे गठण करण्यात आलेले आहे. त्याचप्रमाणे संदर्भाधीन अ.क्र. २ येथील शासन निर्णयान्वये खरेदीची कार्यवाही व खरेदीबाबतचे वेळापत्रक विहित करण्यात आले आहे. अ.क्र.२ येथील शासन निर्णयामधील "ड" नुसार विहित करण्यात आलेल्या कार्यपध्दतीनुसार तांत्रिक लिफाफे उघडण्याबाबतची कार्यवाही करण्याबाबत विहित करण्यात आले आहे. पोलीस विभागांतर्गत करावयाच्या खरेदीच्या अनुषंगाने अर्थसंकल्पित झालेला योजनेत्तर, योजनांतर्गत व पोलीस दल आधुनिकिकरणाचा निधी प्रकरणपरत्त्वे वित्त व नियोजन विभागाच्या मान्यतेने खर्चासाठी उपलब्ध करुन देण्यात येतो. नियोजन व वित्त विभागाच्या अशा प्रस्तावांना मान्यता मिळण्यास काही कालावधी लागतो. अशी मान्यता मिळेपर्यन्त खरेदी पध्दतीमधील वाणिज्यिक लिफाफे उघडण्याची कार्यवाही त्यामुळे थांबवावी लागते. सदरची खरेदी विहित वेळेत पूर्ण होण्याच्या दृष्टीने अर्थसंकल्पात ज्या बाबींसाठी तरतूद करण्यात आलेली आहे त्या बाबींच्या अनुषंगाने निविदा प्रक्रियेद्वारे न्युनत्तम निविदाकार निश्चित करण्यापर्यन्तची कार्यवाही करुन ठेवल्यास निधी उपलब्ध झाल्यानंतर पुरवठा आदेश देवून प्रत्यक्षात खरेदी करणे सुलभ होणार आहे. त्याचप्रमाणे ज्या बाबींसाठी अर्थसंकल्पामध्ये तरतूद करण्यात आलेली आहे त्यापैकी ज्या बाबींची खरेदी दरकरारानुसार वा पुनर्प्रत्ययी आदेशानुसार करणे शक्य आहे अशा बाबींच्या खरेदीबाबत निधी उपलब्धतेच्या अधीन पुरवठा आदेश देण्यापर्यन्तची कार्यवाही केल्यास त्या त्या वर्षातील खरेदी वेळेत करुन घेणे शक्य होणार आहे. या बाबी लक्षात घेवून दिनांक ३ जून, २००९ च्या शासन निर्णयात खालीलप्रमाणे सुधारणा करणे आवश्यक झाले आहे.

**शासन शुध्दीपत्रक:-** संदर्भाधीन अ.क्र.२ येथील शासन निर्णयातील "ड" मधील मजकुराऐवजी खालीलप्रमाणे समावेश करण्यात येत आहे. त्याचप्रमाणे "ड" नंतर नव्याने "इ" प्रमाणे मजकुर समाविष्ट करण्यात येत आहे.

ड) तांत्रिक समितीचा अहवाल प्राप्त झाल्यानंतर त्यानुसार खरेदी समिती दिनांक २० मे, २००९ च्या शासन निर्णयातील परि-८ मध्ये विहित केल्यानुसार वाणिज्यिक लिफाफे उघडेल व त्यानुसार न्युनतम निविदाकार निश्चित करण्याची कार्यवाही करेल.

इ) मूळ अर्थसंकल्पात वा पूरक मागणीद्वारे निधी उपलब्ध आहे त्यामधील दरकरारावरील बाबींच्या वा पुनर्प्रत्ययी आदेशाद्वारे खरेदी करावयाच्या बाबींच्या खरेदीबाबत मंजूर अनुदानाच्या मर्यादेत निधी उपलब्धतेच्या अधीन राहून पुरवठा आदेश देण्यापर्यन्तची कार्यवाही करण्यात यावी.

२. सदर शासन शुध्दीपत्रक शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २००९०९०९१२४५३२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चंद्रा अय्यंगार )
अपर मुख्य सचिव (गृह) महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रति,
अपर मुख्य सचिव (गृह),
प्रधान सचिव (वित्त),
प्रधान सचिव (उद्योग),
प्रधान सचिव (विशेष),
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई,
महासमादेशक, होमगार्डस, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
अपर पोलीस महासंचालक (नि.व स.), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
पोलीस महानिरीक्षक, सुरक्षा,
पोलीस उप महानिरीक्षक, दहशतवादी विरोधी पथक,
पोलीस उपायुक्त, मुख्यालय-१, मुंबई,
संचालक, न्यायसहाय्यक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, मुंबई,
आयुक्त, उद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
कक्ष अधिकारी, गृह विभाग (पोल-४),
निवड नस्ती.